**नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० चा अभ्यास करण्याकरिता कार्यबल गट (Task Force) गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१७६/विशि-३,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १६ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भः**-(१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. अभ्यास-२०१५/ प्र.क्र.६११/विशि-३, दि.३१ ऑक्टोबर, २०१५
(२) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे D.O.No.7-48/2016-PN-II, दि. ६ जून, २०१९
(३) शासन पत्र क्र.NEP-2019/C.R.96/Vishi-4, दि.१८ सप्टेंबर, २०१९
(४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.०७/विशि-३, दि.२४ जानेवारी, २०२०
(५) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.१७६/विशि-३, दि. १८ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावनाः-**

भारताला ज्ञान महासत्ता बनविण्यासाठी, विद्यार्थ्यांमध्ये आवश्यक कौशल्य व ज्ञानप्राप्ती आणि विज्ञान, तंत्रज्ञान, शिक्षण आणि औद्योगिक क्षेत्रामधील मनुष्यबळाची कमतरता दूर करण्यासाठी, भारतातील लोकसंख्येला गुणवत्तापूर्ण शिक्षण, नाविन्यपूर्ण शिक्षण व संशोधनाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी, भारत सरकारने नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाचा मसुदा तयार केलेला आहे. या मसुद्याबाबत राज्य शासनाकडून सूचना व अभिप्राय मागविले आहेत.

नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या मसुद्याबाबत संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून अभिप्राय मागविले होते. त्यास अनुसरुन संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आपले अभिप्राय शासनास सादर केले आहेत. तसेच, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड व राष्ट्रीय उच्चस्तर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई यांचेकडून या मसुद्याबाबत सूचना/अभिप्राय प्राप्त झालेले आहेत. सदर प्राप्त सूचना/ अभिप्राय मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांना संदर्भीय क्र.(३) येथील पत्रान्वये सादर करण्यात आले आहेत.

नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या अनुषंगाने तालुका व जिल्हा स्तरावरील कार्यशाळांनी त्यांचेशी संबंधित विषयावर सादर केलेल्या सूचनांचे विश्लेषण करुन राज्य स्तरावरील संबंधित सर्व घटकांच्या कार्यशाळेमध्ये सदरहू सूचना सादर करण्यासाठी शिक्षण तज्ज्ञांचा एक कार्यबल गट शासनाने संदर्भीय क्र.(१) येथील दि.३१ ऑक्टोबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये गठीत केला होता.

सदर कार्यबल गटातील अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या संदर्भीय क्र.(४) येथील दि.२४ जानेवारी, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आल्या आहेत.

मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांनी राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० नुकतेच लागू केलेले आहे. त्यामुळे राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० संदर्भात अभ्यास करुन राज्य शासनास अहवाल सादर करण्यासाठी संदर्भ क्रमांक ५ येथील दिनांक १८ सप्टेंबर, २०२० च्या शासन निर्णयानुसार एक कार्यबल गट स्थापन करण्यात आला आहे. सदर कार्यबल गटामध्ये श्रीमती वसुधा कामत यांची अध्यक्ष म्हणून तर श्री. भालचंद्र मुणगेकर यांची सदस्य म्हणुन नियुक्ती करण्यात आली आहे. तथापि, श्रीमती वसुधा कामत यांनी प्रकृती अस्वास्थामुळे तसेच व श्री. भालचंद्र मुणगेकर यांनी वैयक्तीक कारणांमुळे सदर कार्यबल गटात काम करण्यास असमर्थ असल्याचे शासनास कळविले आहे.

उपरोक्त बाब विचारात घेता, नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० संदर्भात अभ्यास करुन राज्य शासनास अहवाल सादर करण्यासाठी नव्याने कार्यबल गटाची स्थापना करणे आवश्यक आहे. तरी संदर्भीय क्र.५ येथील दिनांक १८ सप्टेंबर, २०२० रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन नवीन कार्यबल गट गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शिक्षण क्षेत्रातील खालील तज्ज्ञांचा समावेश करुन नवीन कार्यबल गट निर्माण करण्याचा खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय:</u>**

नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० चा अभ्यास करण्याकरिता गठीत करण्यात आलेल्या कार्यबल गटाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आलेला संदर्भीय क्र.५ येथील दिनांक १८ सप्टेंबर, २०२० चा शासन निर्णय याव्दारे अधिक्रमित करण्यात येऊन नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० संदर्भात अभ्यास करुन राज्य शासनास अहवाल सादर करण्यासाठी शिक्षण क्षेत्रातील तज्ज्ञांचा समावेश करुन नवीन खालीलप्रमाणे कार्यबल गट गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | मान्यवरांचे नाव | पद |
|---|---|---|
| १. | डॉ. रघुनाथ माशेलकर,माजी.महासंचालक, वैज्ञानिक आणि औद्योगिक संशोधन परिषद, नवी दिल्ली. | अध्यक्ष |
| २. | डॉ. सुखदेव थोरात, माजी अध्यक्ष, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली. | सदस्य |
| ३. | डॉ.सुहास पेडणेकर, कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४. | प्रा. शशिकला वंजारी, कुलगुरु, एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई. | सदस्य |
| ५. | डॉ.प्रमोद येवले, कुलगुरु, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | सदस्य |
| ६. | डॉ.राजन वेळूकर, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ७. | डॉ.विलास सपकाळ, माजी कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर | सदस्य |
| ८. | प्रो. जी.डी. यादव, माजी कुलगुरु, रसायन तंत्रज्ञान संस्था (ICT), मुंबई. | सदस्य |
| ९. | डॉ. विजय पाटील, कुलपती, डी.वाय.पाटील विद्यापीठ, नवी मुंबई. | सदस्य |
| १०. | श्री. नितीन पुजार, आंतरराष्ट्रीय सल्लागार, मुंबई | सदस्य |
| ११. | डॉ. अभय वाघ, संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई. | सदस्य |
| १२. | श्री.निरंजन हिरानंदानी, कुलाधिकारी, हैद्राबाद (सिंध) नॅशनल कॉलिजिएट विद्यापीठ, मुंबई. | सदस्य |
| १३. | श्री. भारत अहुजा, संचालक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे (COEP) | सदस्य |
| १४. | श्री. देवीदास गोल्हार, प्राचार्य मराठवाडा वाणिज्य महाविद्यालय, पुणे. | सदस्य |
| १५. | श्री. मिलिंद साटम, सिनेट सदस्य, मुबई विद्यापीठ, मुंबई. | सदस्य |
| १६. | डॉ. अजित जोशी, शिक्षणतज्ञ, पार्ले टिळक व्यवस्थापन महाविद्यालय, मुंबई. | सदस्य |
| १७ | श्री. विजय कदम, संस्थापक विश्वस्त शिवविद्या प्रबोधीनी, मुंबई. | सदस्य |
| १८ | डॉ. धनराज माने, संचालक, उच्च शिक्षण, पुणे | समन्वयक |

सदरहू समितीने नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० मधील प्रत्येक मुद्द्याचा अभ्यास करुन आपला अहवाल शासनास ३ महिन्यात सादर करावा. तथापि, काही तातडीच्या मुद्द्यांबाबत शासनास प्राधान्याने अहवाल सादर करणे अपेक्षित असल्यास समितीने वेळोवेळी बैठका घेऊन अंतरीम अहवाल शासनास सादर करावा.

सदरहू समितीच्या बैठका ज्या विद्यापीठांमध्ये होतील, त्या विद्यापीठांनी समितीमधील अशासकीय सदस्यांचे मानधन व प्रवासभत्ता परस्पर अदा करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२०१०१६१७४५४०९८०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2020.10.16 17:48:57 +05'30'

**( अ. म. बाविस्कर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत, माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. डॉ. रघुनाथ माशेलकर,माजी महासंचालक, वैज्ञानिक आणि औद्योगिक संशोधन परिषद, नवी दिल्ली.
६. डॉ.सुखदेव थोरात, माजी अध्यक्ष, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली
७. डॉ.सुहास पेडणेकर, कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई
८. प्रा. शशिकला वंजारी, कुलगुरु, एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई.
९. डॉ.प्रमोद येवले, कुलगुरु, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
१०. डॉ.राजन वेळूकर, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई
११. डॉ.विलास सपकाळ, माजी कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.
१२. प्रो. जी.डी. यादव, माजी कुलगुरु, रसायन तंत्रज्ञान संस्था (ICT), मुंबई.
१३. डॉ. विजय पाटील, कुलपती, डी.वाय.पाटील विद्यापीठ, नवी मुंबई.
१४. श्री. नितीन पुजार, आंतरराष्ट्रीय सल्लागार, मुंबई
१५. श्री. अभय वाघ, संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई
१६. श्री.निरंजन हिरानंदानी, कुलाधिकारी, हैद्राबाद (सिंध) नॅशनल कॉलिजिएट विद्यापीठ, मुंबई.
१७. श्री. भारत अहुजा, संचालक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे (COEP)
१८. डॉ.देवीदास गोल्हार, प्राचार्य, मराठवाडा वाणिज्य महाविद्यालय, पुणे.
१९. श्री, मिलिंद साटम, सिनेट सदस्य, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
२०. डॉ. अजित जोशी, शिक्षणतज्ञ, पार्ले टिळक व्यवस्थापन महाविद्यालय, मुंबई.
२१. श्री. विजय कदम, संस्थापक विश्वस्त शिवविद्या प्रबोधीनी, मुंबई.
२२. डॉ. धनराज माने, संचालक, उच्च शिक्षण, पुणे
२३. निवडनस्ती (विशि-३).